# काकडीचा देठ

## एक बंगाली लोककथा



# काकडीचा देठ

एक बंगाली लोककथा

अनुवाद - रुचिरा सावंत





एक  होता लाकूडतोड्या.
त्याला आणि त्याच्या पत्नीला मूल नव्हते.
एक दिवस लाकूडतोड्याच्या बायकोला
एक स्वप्नं पडले.
शुस्ती या लहान मुलांच्या देवीने तिच्या
स्वप्नात येऊन तिला सांगितले की, " एक
काकडी शोध आणि खा. त्यानंतर तुला
एक सुंदर मुलगा होईल."
लाकूडतोड्याला त्याच्या बायकोने
शुस्तीने सांगितलेली गोष्ट सांगितली.

दुसऱ्या दिवशी लाकूडतोड्याा जेव्हा जंगलात गेला तेव्हा त्याला तिथे एक म्हातारी बाई भेटली.
तिच्या पाठीला बाक होता.
ती एका काठीच्या सहाय्याने ठुम्मक- ठुम करत चालत होती.
त्या म्हातारीने आपल्या बटव्यातून एक काकडी काढून लाकूडतोड्याला दिली आणि म्हणाली, "आपल्या बायकोला ही काकडी मी सांगते आहे  तशीच खायला सांग. सात दिवसानंतरच तिने ही पूर्ण काकडी खावी.



तिने सात दिवस थांबावे आणि त्यानंतरच काकडीला देठासहित खावे."



पण गडबडीत तिला तो ती काकडी देठासाहित
खायची आहे हे सांगायला विसरला.
त्यानंतर तो जंगलात पुन्हा निघून गेला.

लाकूडतोड्या आपल्या बायकोला ही
आनंदाची वार्ता सांगायला पळत पळत घरी
आला आणि म्हणाला,
"बघ बरं, शुस्ती देवीने तुझ्यासाठी काय
पाठवलं आहे.
पण तू ते आता नको खाऊस.
आता त्याला तू ठेऊन दे.
सात  दिवसांनंतरच तू ते खा."



लाकूडतोड्याच्या बायकोने स्वत:शीच विचार केला, "मी का बरं सात दिवस वाट पाहू?" असा विचार करून तिने काकडी खाल्ली आणि देठ फेकून दिला.





जेव्हा लाकूडतोड्या घरी आला तेव्हा त्याने फेकलेला देठ पहिला.
आणि त्याने आपल्या बायकोला विचारले, "तू सात दिवस वाट का नाही पाहिलीस? आणि तू काकडी पूर्ण सुद्धा नाही खाल्लीस! जा जाऊन लवकर त्याचा देठ सुद्धा  खाऊन घे!"

त्यानंतर बायकोने काकडीचा देठ सुद्धा खाल्ला. नंतरच्या अठरा क्षणांच्या अवधीत तिच्या कुशीत एक लहानसा मुलगा बसला होता. तो मुलगा दोन बोटं उंचीचा होता  तर चार इंच लांबीची एक वेणी सुद्धा त्याला होती.







आपल्या मुलाला पाहताच लाकूडतोड्या घराबाहेर पळून गेला.
लाकूडतोड्याची बायको तर मुलाला पाहून जोरजोरात रडू लागली.
पाण्यात बुडून मरण्याच्या उद्देशाने ती गावातील नदीच्या दिशेने निघाली.

ती छोटीशी बोटाएवढी प्रतिकृती सुद्धा आपल्या आई मागून पळू लागली. तो मुलगा ओरडत होता, "आई परत फिर! मला कडकडून भूक लागली आहे!"
शेवटी आईच ती. मुलाचा आवाज ऐकून लाकूडतोड्याची बायको नदीतून बाहेर आली आणि तिने आपल्या मुलाला दूध पाजले.

दूध पिऊन झाल्यावर त्या छोट्या अंगुलीने, "आता मी माझ्या बाबांना शोधायला जातो आहे." असं सांगितलं. पुढे दोन चार पाऊले उडया मारल्यानंतर मात्र तो अचानक थांबला.
कारण त्याचे वडील तिथे एक झाड कापत होते.
त्याने म्हटलं, "बाबा, माझ्यासोबत आता घरी चला. आई रडते आहे."



लाकूडतोड्याने आपल्या मुलाकडे एक कटाक्ष टाकला. मग त्याने त्या छोट्याश्या अंगुलीला उचलून आपल्या कुशीत घेतलं.
आणि म्हणाला, " आता मी घरी नाही येऊ शकत. कारण मी स्वतःला राजाला विकलं आहे. आता मी राजाचा लाकूडतोड्या आहे."



हे ऐकल्यावर छोटा अंगुली राजाकडे गेला. आणि म्हणाला, "राजमोशाई, मला तुमच्या लाकूडतोड्याला विकत घ्यायचं आहे. त्या साठी मला काय किंमत द्यावी लागेल?"

“आधी तू मला एक कवडी दे. त्यानंतर तुला माझे आणखी एक काम करावे लागेल. त्यानंतरच मी लाकूडतोड्याला तुझ्याकडे परत पाठवीन." राजाने सांगितलं.

छोटा अंगुली तलावाजवळ बसून कवडी कुठून मिळवायची बरं? याचा विचार करु लागला. तेवढ्यातच कुणी तरी त्याची वेणी खेचली आणि तो आपल्या पाठीवर पडला.



एका कर्कश आवाजात त्याला विचारणा झाली, "अरे ए छोट्या! तू कोण आहेस? हे ऐकताच छोटा अंगुली उडी मारून उभा राहिला. तो रागाने लाल झाला होता. तो म्हणाला, "मी जो कुणी असेन तो असेन. पण तू कोण आहेस?"





“मी बेडकांचा राजकुमार आहे." कर्कश आवाजात उत्तर आले.

त्यावर छोटा अंगुली म्हणाला,

"तुझा हा कर्कश आवाज मी एका क्षणात बंद करू शकतो. पण त्यासाठी मला एक कुऱ्हाडीची आवश्यकता आहे. जी आता माझ्याजवळ नाही."

यावर तो बेडकांचा राजकुमार म्हणाला,

“किती विचित्र गोष्ट आहे!

आपल्या दोघांनाही कुऱ्हाडीची गरज आहे.

मी माझ्या वडिलांच्या परवानगीशिवाय मंडुक राजकन्येशी लग्न केलं.

म्हणून माझ्या वडिलांनी माझ्या पत्नीला भोपळ्यात बंद करून , त्या भोपळ्याला एका काठीला बांधले आणि झाडावर अडकवले.

मी तुला कुऱ्हाड खरेदी करण्यासाठी एक कवडी दिली तर तू झाड कापशील का?"

छोटा अंगुली म्हणाला,
"नक्की, पण झाड कापून झाल्यावर तू मला आणखी एक कवडी द्यायचीस."
आणि अशा प्रकारे त्या दोघांमध्ये सौदा पक्का झाला.
मंडुक राजकुमार कमळाच्या पानावर वाट पाहत बसला.
छोट्या अंगुलीला वाटेत एक लोहार भेटला.
तो गरम लोह्यावर घाव घालत होता.
त्या लोहाराची उंची तीन बोटे होती तर दाढीचा लांबी चार बोटं होती.
छोट्या अंगुलीने लोहाराला कुऱ्हाडीसाठी आपल्याजवळ असणारी एक कवडी देऊ केली.





मग छोटा अंगुली त्या एरंडाच्या झाडापाशी
आला जिथे भोपळ्याची गुठळी टांगली होती.
त्याने ते झाड कापण्याचा खूप प्रयत्न केला पण
झाडाची साल  प्रचंड जाडी होती.
आता हे सगळं पाहून बेडकांचा राजपुत्र रडू
लागला.

छोट्या अंगुलीने आता वर पाहिलं.
भोपळा एका काठी ला लटकत होता आणि ती
काठी एका फांदीला बांधलेली होती.
ते पाहताच तो आनंदाने "अरे वाह!" असं
म्हणत सहजतेने झाडावर चढून त्या
भोपळ्याच्या गुठळी पर्यंत पोहोचला.





त्याने आपली वेणी भोपळ्याला बांधली आणि तो
ओरडला, "बेडकांच्या राजकन्ये! आता तू या
दोरीच्या सहाय्याने खाली ये. खाली मंडुक राजपुत्र
अगदी अधीरतेने तुझी वाट पाहतो आहे."
त्यानंतर बेडकांची राजकुमारी खूप सहजतेने
छोट्या अंगुलीच्या वेणीच्या आधारे खाली उतरली.

तिच्या जोडीने काठी आणि भोपळा सुद्धा आले.
छोट्या अंगुलीने सावधगिरीने त्यांनाही जमिनीवर उतरवले.
त्यानंतर बेडकांच्या राजपुत्राने छोट्या अंगुलीचे आभार मानलेच पण सोबतच त्याला एक कवडी सुद्धा दिली.



मंडुक राजकन्या म्हणाली,
"हा थुंकीपासून बनवलेला एक जादूचा चेंडू आहे. लवकरच तुला याची गरज पडेल."



भोपळा आणि काठी  म्हणाले,
"तुला आमची सुद्धा गरज पडणार आहे. तेव्हा आम्ही सुद्धा तुझ्या सोबत येतो आहोत."



त्यानंतर छोटा अंगुली राजाच्या दरबारात गेला.
सिंहसनापाशी जाऊन तो उभा राहिला.
"राजमोशाई," तो म्हणाला,
"ही घ्या कवडी.
आता तुम्ही माझ्या वडिलांना परत पाठवणार का?"
त्यावर राजा म्हणाला,
"ठीक आहे. पण त्या आधी तुला माझे आणखी एक काम करावे लागेल.

नदीच्या पल्याड चोरांचे एक गाव आहे.
दररोज रात्री ते चोर माझ्या माणसांच्या घरात चोरी करतात.
तू त्या चोरांच्या राजाला पकडून आण.

मग मी त्याचं लग्न माझ्या अधू दृष्टी असलेल्या मुलीशी लावून देईन.
त्यानंतर तो चोरांना माझ्या राज्यात चोरी करायला बंदी घालेल.
जेव्हा तू माझे हे काम पूर्ण करशील तेव्हा मी तुला लाकूडतोडया परत करीन."





यावर छोटा अंगुली म्हणाला,
"मी चोरांचा राजा आणि त्याचे सगळे चोर यांना मारून पळवून लावणार.
आणि मग मी स्वतःच राजकुमारीसोबत विवाह करणार."
हे ऐकताच राजाने छोट्या अंगुलीकडे फार रागाने पाहिले आणि विचारले,

“तू इतक्या सगळ्या चोरांना कसा काय पळवशील?"
छोटा अंगुली म्हणाला,
"मला महालातील एक काळी मांजर द्या. राजकुमाराचे रेशमी कपडे आणि एक सोनेरी पगडी सुद्धा द्या. आणि मग पहा मी काय गंमत करतो."
राजा ने त्याचं म्हणणं मान्य केलं.



मग रात्रीच्या अंधारात छोट्या अंगुलीने ते महागडे कपडे परिधान केले.





त्याने काठी आणि भोपळा सोबत घेतला आणि तो महालातील काळ्या मांजरीवर स्वार झाला.

मग त्याने कुठला ही आवाज न करता चोरांच्या गावात प्रवेश केला.



आता तो गुपचूप चोरांच्या राजाच्या महालात प्रवेश कर्ता झाला. तिथे गेल्यावर मांजर सरळ स्वयंपाक घरात गेली आणि तिथे असणारं सारं भोजन आणि खाणं तिने खाऊन टाकलं.

महालात खाण्यासाठी आता काहीच बाकी राहीलं नव्हतं.
चोरांच्या राजाला मात्र खूप भूक लागली होती.
त्याने सगळ्या चोरांना महालातील काळ्या मांजरीला पकडण्यासाठी बोलवले.





त्या दहा हजार माश्यांनी सगळ्या चोरांना आपले डंख मारले.



छोट्या अंगुलीने काठी आणि भोपळ्याला आपल्या हातात घेतले. त्या भोपळ्यामधून साधारण दहा हजार माश्या बाहेर आल्या.



राजा आणि त्याचे चोर आता आरडाओरडा करु लागले. वेदनेने ते विव्हळू लागले.

आणि मग ते तिथून पळून गेले. त्यानंतर ते पुन्हा कधीच परत फिरले नाहीत.

मग छोटा अंगुली राजाजवळ परत आला.
राजाने त्याला लाकूडतोड्या परत केला.





छोट्या अंगुलीने बेडकांच्या राजकन्येने दिलेल्या जादूच्या चेंडूने अधू दृष्टी असलेल्या राजकुमारीच्या डोळ्याला स्पर्श केला.
त्यानंतर जेव्हा राजकुमारीने आपले डोळे उघडले तेव्हा ते ताऱ्यांप्रमाणे चमकत होते.

जेव्हा राजाने लग्नाची तयारी सुरू केली
तेव्हा जंगलातून एक म्हातारी बाई आली.
तिच्या पाठीला बाक होता.
ती ठुम्मक- ठुम करत एका काठीच्या
सहाय्याने चालत होती.
तिने छोट्या अंगुलीला एक काकडी देऊन
सांगितले,
"याला पूर्ण खा. अगदी देठासाहित."





ती काकडी खाताच छोटा अंगुली सहा फूट उंच
झाला!

राजाने लाकूडतोड्याची बायको,
बेडकांचा राजकुमार,  बेडकांची
राजकुमारी यांना घेऊन येण्यासाठी
एक रथ पाठवला.
लोहार येताना आपल्यासोबत
लाकूडतोड्यासाठी एक सोन्याची
कुऱ्हाड सुद्धा घेऊन आला.





लोकांनी जल्लोष केला!

तोफांच्या फैरी झाडल्या गेल्या!

ढोल वाजले!

बासऱ्या वाजल्या!

मंडुक राजकुमाराने उडया मारल्या,

मंडुक राजकुमारी नाचली, लोहार

सुद्धा  फिरक्या घेत नाचला.

त्यावेळी त्याची लांब दाढी सुद्धा

गोल गोल फिरली!

संपूर्ण रात्र लोकांनी जल्लोष केला.
लग्नाची मेजवानी सुरू होती.
दुसऱ्या दिवशी सकाळी मात्र
जंगलातून जोरात आवाज आला.
लाकूडतोड्या आपल्या नव्या
कुऱ्हाडीने झाड कापत होता...

....कट- कट- कट- कट!

समाप्त

